# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक-दुरुस्ती-०४१७/प्र.क्र.२६२/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक १० जुलै २०१७.

**विषय** :- पोलीस अधीक्षक, बीड, यांच्या अधिकारक्षेत्रात (१) अंभोरा (तालुका-आष्टी), (२) दींद्रुड (तालुका-मांजलगांव) व (३) शिरुर (तालुका-शिरुर), येथील पोलीस प्रशासकीय व निवासी इमारतींची दुरुस्ती करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ दुरुस्ती-कार्यक्रम-आढावा/ ३७१/ ०९, दिनांक २१.०३.२०१७.

**ज्ञापन :-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी पोलीस अधीक्षक, बीड, यांच्या अधिकारक्षेत्रात (१) अंभोरा (तालुका-आष्टी), (२) दींद्रुड (तालुका-मांजलगांव) व (३) शिरुर (तालुका-शिरुर), येथील पोलीस निवासस्थानांची दुरुस्ती करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी, संबंधित उपअभियंता, सार्वजनिक बांधकाम, यांनी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार तयार केलेले खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. हे अंदाज, संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम, आणि पोलीस अधीक्षक, बीड, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते पुढीलप्रमाणे सुधारित केले आहेत व प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे:-

| अ.क्र. (१) | कामाचे नाव (२) | खर्चाचे अंदाज (३) |
|---|---|---|
| १. | "Repairs to Old Police Quarters at Ambhora." | रु.२,००,८२१/- |
| २. | "Repairs to Police Constabulary Quarters at Ambhora." | रु.२,३०,९५९/- |
| ३. | "Repairs to 15 Police Quarters and construction of compound wall at Shirur." | रु.५६,१५,६९२/- |
| ४. | "Repairs to the building of Police Station at Ambhora." | रु.६,६९,७०५/- |
| ५. | "Repairs to Police Quarters building at Dindrud, Blocks No.1 and 2 (Eight quarters)." | रु.१४,२४,३९६/- |

| अ.क्र. (१) | कामाचे नाव (२) | खर्चाचे अंदाज (३) |
|---|---|---|
| ६. | "Repairs to Police Quarters building at Dindrud, Blocks No.3 and 4 (Seven quarters)." | रु.११,४१,७६२/- |
| ७. | "Construction of C.C. Road A/R to A.P.I. Quarters at Dindrud." | रु.१२,६६,१०१/- |
| ८. | "Construction of C.C. Road along roadside in the premises of Police Station, Dindrud." | रु.१०,९२,६१०/- |
| ९. | "Repairs to Police Station building at Dindrud." | रु.१२,१५,५०४/- |
| **एकूण** | | **रु.१,२८,५७,५५०/-** |

४. त्या अनुसार, पोलीस अधीक्षक, बीड, यांच्या अधिकारक्षेत्रात (१) अंभोरा (तालुका-आष्टी), (२) दींद्रुड (तालुका-मांजलगांव) व (३) शिरुर (तालुका-शिरुर), येथील पोलीस प्रशासकीय व निवासी इमारतींची दुरुस्तीची कामे करण्यासाठी, परिच्छेद ३ मधील तक्यात विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे, **रु.१,२८,५७,५५०/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये या अटीवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००)(०१) जिल्हा पोलीस बल (अनिवार्य) (दत्तमत) (२०५५ ०१६८), २७, लहान बांधकामे, या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४२३/इमा-२, दिनांक २९.०४.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०७२४१५४१५३१८२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.07.24 15:47:41 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.

२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) विशेष पोलीस महानिरीक्षक, औरंगाबाद परिक्षेत्र, औरंगाबाद.
४) पोलीस अधीक्षक, बीड.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमाक २, बीड.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अंबेजोगई, जिल्हा-बीड.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
९) निवड फाईल (पोल-७).